आयोजित करण्यात येणाऱ्या बैठकींच्या
सूचना ई-मेलव्दारे पाठविण्याबाबत -

# महाराष्ट्र शासन

शासन निर्णय : क्रमांक : मातंसं-२००९/प्र.क्र.४८/३९,
सामान्य प्रशासन विभाग,
सातवा मजला, राजमुद्राच्या बाजुला,
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
दिनांक : ९ नोव्हेंबर, २००९.

मुख्यमंत्री महोदयांकडे आयोजित करण्यात येणाऱ्या विविध बैठकांचे निमंत्रण / सूचना या लेखी स्वरुपात विविध विभागांना/अधिकाऱ्यांना देण्यात येत असतात. यामध्ये वेळेचा तसेच सामग्रीचा बराच अपव्यय होतो. काही वेळेला निमंत्रण सूचना या संबंधितांना वेळेवर पोहोचत नाहीत. त्यामुळे यापुढे सर्व बैठकींच्या सूचना ई-मेलव्दारे पाठविण्यात याव्यात. या संदर्भाने शासन खालीलप्रमाणे निर्णय घेत आहे.

**शासन निर्णय:-**

मा.मुख्यमंत्री महोदयांकडे होणाऱ्या सर्व बैठकींच्या सूचना मुख्यमंत्री कार्यालयाकडून ई-मेलव्दारे सर्व संबंधितांना कळविण्याची पध्दत अस्तित्वात आहे. याच धर्तीवर मंत्रालयातील सर्व विभागांनीसुध्दा त्यांच्याकडे होणाऱ्या बैठकांसाठी याच पध्दतीचा अवलंब करावा. ई-मेलव्दारे दिलेल्या सूचनाच पुरेशा असल्याने पुन्हा लेखी (कागदपत्रांचा वापर करुन) सूचना देण्याची आवश्यकता नाही. ई-मेलने दिलेली बैठकीची सूचना पुरेशी आहे, असे ग्राह्य धरण्यात येईल".

या शासन निर्णयाची प्रत महाराष्ट्र शासन www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आली असून त्याचा संगणक संकेतांक २००९११०९१८००१६००१ असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

( डॉ.संतोष भोगले )
अवर सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रत माहितीसाठी व आवश्यक त्या कार्यवाहीसाठी,**
शासनाचे सर्व अ.मु.स./प्र.स./सचिव,
सर्व विभागीय आयुक्त